प्रधानमंत्री आदि आदर्श ग्राम विकास योजना या केंद्रीय योजनेंतर्गत सन २०२१-२२ व सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाकरिता मंजुर करणेत आलेल्या ग्राम विकास आराखड्यांना निधी वितरीत करण्याबाबत.....
(गोंदिया जिल्हा)

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय : क्रमांक आअग्रा २०२३/प्र.क्र.६८/का.१९**
मादम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०५ जुलै, २०२३.

**वाचा :-**

१. केंद्र सरकार जनजातीय कार्य मंत्रालय चे अ.शा. पत्र क्र. १७०११/०१/२०२०/SCA, दिनांक १७ मार्च २०२२.
२. आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक- संकिर्ण-२०२२/प्र.क्र. ९२/का. १९ दिनांक १३/०७/२०२२.
३. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचे पत्र क्र.विकेस २०२२/प्र.क्र.५(ब)/का.८(५)/ ६२३३, दिनांक २८/१०/२०२२
४. आदिवासी विकास विभाग, शासन पत्र क्रमांक- संकिर्ण-२०२२/प्र.क्र. ९२/का. १९ दिनांक ०२/०२/२०२२.
५. जनजाती कार्य मंत्रालयाचे पत्र क्रमांक ११०१५/०१(२४)/२०२१- SCA, दिनांक २४ मे २०२३
६. आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक-आविवि२०२२/प्र.क्र.१४६/का.-१९ दिनांक , २१ फ़ेब्रुवारी २०२३, दिनांक ३ मार्च २०२३

**प्रस्तावना :-**

अनुसूचित जमातीच्या लोकसंख्या असलेल्या गावांचा आदर्श गाव संकल्पनेवर आधारित एकात्मिक आर्थिक व सामाजिक विकास करण्यासाठी आदि आदर्श ग्राम विकास ही योजना सुरू करण्याचा निर्णय घेऊन संदर्भ १ येथील पत्रान्वये केंद्र शासनाने मार्गदर्शक सुचना निर्गमित केल्या आहेत. योजनेच्या अंमलबजावणी करिता राज्यस्तरावरील आस्थापनांमध्ये स्पष्टता राहण्यासाठी राज्य शासनाने केंद्र सरकारच्या सुचनांच्या आधारे मार्गदर्शक सुचनांचा शासन निर्णय संदर्भ २ अन्वये निर्गमित केला आहे. सदर योजना सन २०२१-२२ ते २०२५-२६ या कालवधीकरिता राबविणेत येणार आहे. या करिता केंद्र शासनाने ३६०५ गावे निवडली असुन दरवर्षी एक पंचमअंश गावांना अंदाजे रु. २०.३८ लक्ष इतका निधी प्रति गाव एकवेळ उपलब्ध करुन देणेत येणार आहे.

२. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांनी सदर योजनेकरिता संदर्भ ३ येथील पत्रान्वये अपर आयुक्त, आदिवासी विकास, नागपुर यांच्या कार्यक्षेत्राकरिता राज्य शासनास प्रस्ताव सादर केले होते. सदर प्रस्ताव मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील राज्यस्तरीय समितीच्या मान्यतेने संदर्भ ४ येथील पत्रान्वये केंद्र शासनास सादर केले होते.

३. प्रकरणी जनजाती कार्य मंत्रालय, भारत सरकार यांच्या प्रकल्प मुल्यमापन समितीची ऑनलाईन बैठक दिनांक १४ मार्च २०२३ रोजी पार पडली. सदर बैठकीचे इतिवृत्त जनजाती कार्य मंत्रालयाने संदर्भ ५ येथील पत्रान्वये निर्गमित केले असुन, त्यान्वये राज्य शासनाने प्रस्तावित केलेल्या गावांपैकी १५४२ गावांचे ग्राम विकास आराखडे मंजुर केल्याचे कळविले आहे.

४. सदर योजनेंतर्गत केंद्र शासनाकडुन प्राप्त झालेला निधी संदर्भ ६ येथील शासन निर्णयान्वये वितरीत करणेत आला आहे. आता, ग्रामविकास आराखड्यातील कामांना प्रशासकीय मान्यता देऊन प्रत्यक्ष प्रस्तावित निधीच्या अनुषंगाने प्राप्त निधीच्या प्रमाणात रु. ३१९.२३ लक्ष इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन आहे.

**शासन निर्णय –**

प्रधान मंत्री आदि आदर्श ग्राम योजना या केंद्र पुरस्कृत योजनेअंतर्गत सन २०२१-२२ व सन २०२२-२३ करिता केंद्र शासनाने गोंदिया जिल्ह्यातील मंजुर केलेल्या ग्राम विकास आराखड्यांकरिता पुढीलप्रमाणे निधी उपलब्ध करुन देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | अपर आयुक्त | जिल्हा | प्रकल्प अधिकारी | केंद्र शासनाकडुन मंजुरी मिळालेल्या गावांची संख्या | ग्राम विकास आराखड्याच्या अंमलबजावणीकरिता आवश्यक निधी रु. लक्ष | आता उपलब्ध होऊ शकणारा निधी रु. लक्ष |
|---|---|---|---|---|---|---|
| ०१ | नागपूर | गोंदिया | देवरी | ३० | ७२६.०० | ३१९.२३ |

२. केंद्र शासनाने मंजुर केलेल्या ग्राम विकास आराखड्यांकरिता कामनिहाय वितरीत करण्यात येणा-या निधीचे विवरण सोबत जोडलेल्या परिशिष्टामध्ये नमुद करण्यात आले आहे.

३. सदर निधी खालील अटींच्या अधिन राहुन वितरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

अटी

I. मंजुर गावांच्या ग्रामविकास आराखड्याला केंद्र शासनाकडुन रु. २०.३८ लक्ष इतका निधी एकवेळ मंजुर झाला आहे. यांतर्गत केंद्र शासनाकडुन पुनश्चः निधी उपलब्ध करुन दिला जाणार नाही.यामुळे –

**१. ज्या गावांच्या ग्रामविकास आराखड्यातील कामांची रक्कम रु. २०.३८ लक्ष पेक्षा कमी असेल अशा ग्रामविकास आराखड्यातील कामांकरिता प्रत्यक्ष प्रस्तावित रक्कमेइतकाच निधी उपलब्ध करुन दिला जाईल. सबब, मंजुर कामे मंजुर निधीच्या मर्यादेतच करण्यात यावीत.**

**२. ज्या गावांच्या ग्रामविकास आराखड्यातील कामांची रक्कम रु. २०.३८ लक्ष पेक्षा जास्त असली तरीही अशा ग्रामविकास आराखड्यातील कामांकरिता रु. २०.३८ लक्ष इतकाच निधी उपलब्ध करुन दिला जाईल. याकरिता अधिकचा निधी कोणत्याही परिस्थितीत राज्य / केंद्र शासनाकडुन उपलब्ध करुन दिला जाणार नाही. सदर निधी अन्य योजनेतुन अभिसरणाच्या (कन्व्हर्जन्स) माध्यमातुन उपलब्ध करुन घेण्याची सर्वस्वी जबाबबदारी संबंधित अंमलबजावणी यंत्रणेची असेल. याबाबतचे कोणतेही दायित्व केंद्र/ राज्य शासनाकडुन स्विकारण्यात येणार नाही.**

II. ज्या कामासाठी अनुदान मंजुर झाले आहे, त्याच कामावर खर्च करणे बंधनकारक राहील. सदर मंजूर कामे शासनाने वेळोवेळी शासन निर्णयान्वये विहीत केलेल्या सुचनांनुसार करण्यात यावीत.

III. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेल्या सर्व कामांसाठी तांत्रिक मंजूरी, निविदा काढणे/स्वीकारणे, कार्यारंभ आदेश देणे इत्यादी बाबतची कार्यवाही सक्षम प्राधिकाऱ्यांकडून करून घेण्याची जबाबदारी प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, यांची राहील. तसेच सदरील कामे मंजूर अनुदानाच्या मर्यादेतच पूर्ण होतील याची दक्षता घेण्यात यावी. तसेच विहित कालावधीतच संबंधित कामे पूर्णत्वास आणावीत.

IV. सदरील कामे हाती घेण्यापूर्वी संबंधित क्षेत्रात जिल्हा परिषद, पंचायत समिती व ग्रामपंचाचतीच्या सार्वत्रिक निवडणूकांसाठी आचारसंहिता अंमलात नाही याबाबत प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, यांनी खात्री करावी. तसेच कामांची व्दिरूक्ती होणार नाही, कामे दर्जेदार व चांगल्या प्रतीचे असल्याबाबत प्रकल्प अधिकारी, यांनी खात्री करून कोणत्याही प्रकारची अनियमितता होणार नाही, याची दक्षता घ्यावी.

V. सदर काम पूर्ण झाल्यावर त्याठिकाणी "प्रधानमंत्री आदि आदर्श ग्राम विकास योजनेतंर्गत प्राप्त निधीतून पूर्ण करण्यात आले आहे." असा फलक लावण्यात यावा.

VI. सदर योजनेतंर्गत घेतलेल्या कामांची गाव निहाय, कामनिहाय व मंजूर निधीची माहितीची नोंद प्रकल्प कार्यालयाने स्वतंत्र नोंदवहीत ठेवावी.

VII. सदरहू कामांचे प्रस्ताव तयार करताना कामाचे समर्थन, शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या परिपत्रकातील/पत्रातील सूचनांचे अनुपालन या सर्व बाबींचा क्षेत्रिय

पातळीवर विचार करण्यात आलेला आहे व प्रस्तावाची क्षेत्रिय पातळीवर सर्व तांत्रिक दृष्टीकोनातून छाननी करण्यात आलेली आहे, या सर्व बाबींची कार्यारंभ आदेश देण्यापूर्वी पुन्हा एकदा प्रकल्प स्तरावर खातरजमा करून घेण्यात यावी.

VIII. सदर कामास वन विभागाच्या तसेच अन्य प्राधिकरणांच्या मान्यतेची आवश्यकता असल्यास संबंधित प्राधिकरणाची परवानगी घेण्याची जबाबदारी तांत्रिक मान्यता देणाऱ्या अधिकाऱ्यांची असेल.

IX. प्रशासकीय मान्यतेतील काम अन्य कोणत्याही योजनेत/कार्यक्रमात समाविष्ट नाही, याची खातरजमा तांत्रिक मान्यता प्रदान करण्यापूर्वी करण्यात यावी.

४. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांनी प्रधानमंत्री आदि आदर्श ग्राम विकास योजनेकरिता सन २०२१-२२ व सन २०२२-२३ करिता संदर्भ ६ येथील शासन निर्णयान्वये वितरीत करणेत आलेल्या निधीमधुन संबंधित प्रकल्प अधिकारी यांना SNA खात्याच्या अनुषंगाने केंद्र व राज्य सरकारने आजवर दिलेल्या सुचनांचे अनुपालन करुन निधी उपलब्ध करुन द्यावा. सदर निधी खर्च झालेनंतर कामांच्या प्रगतीनुसार शासनाकडे पुढील निधीची मागणी प्राप्त झाल्यानंतर पुढील हप्ता वितरीत करणेत येईल.

५. अंमलबजावणी यंत्रणा व नियंत्रक अधिकारी यांनी सदर कामे विहीत मुदतीत पुर्ण करुन त्याची उपयोगिता प्रमाणपत्रे विहित नमुन्यात सादर करावीत.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०७०५१५०१०४३१२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAKASH VIJAY WAJE

Digitally signed by PRAKASH VIJAY WAJE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=1b4b695a8c26d140fc5c049d281eedbf23beed9a89ad7526416132cf28f14776, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=400892E5E82479E4F3C8CF46538DC917B7071E979796D37178D3B709E19155AB, cn=PRAKASH VIJAY WAJE
Date: 2023.07.05 15:04:59 +05'30'

**( प्र. वि. वाजे )**

**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.

२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव.

३. मा. उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव.

४. मा. अध्यक्ष व मा. उपाध्यक्ष, विधान परिषद, विधान भवन, मुंबई.

५. मा. सभापती व मा. उपसभापती, विधान सभा, विधान भवन, मुंबई.

६. मा. मंत्री, आदिवासी विकास विभाग, यांचे खाजगी सचिव.

७. अपर मुख्य सचिव, आदिवासी विकास विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.

८. आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नाशिक.-

९. सर्व उप सचिव, अवर सचिव व कक्ष अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

१०. अपर आयुक्त, आदिवासी विकास,नागपुर.

११. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, गोंदिया.

१२. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, देवरी.

१३. निवड नस्ती (का-९), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

Annexure

**VILLAGE DEVELOPMENT PLAN (VDP) PRADHAN MANTRI AADI ADARSH GRAM YOJANA (PMAAGY)**

## Gondia District

| Sr. No. | Name of Project | Block | Village | Name details of works / activities identified | Estimated Cost of Work (Rs. in Lakh) | Amt. To be Released (Rs. in Lakh) |
|---|---|---|---|---|---|---|
| 1 | Deori | Deori | Pindakepar Tekabeder | 1) Construction of new drain from Baburao Kolhare to Arkara House 200 m. | **20.00** | 8.79 |
| | | | | **1** | **20.00** | 8.79 |
| 2 | Deori | Deori | Charbhata | 1)Construction of Cement Nali (Drenge Line) From Uttamrao Raut to Baliram Pradhan House 100 m | **10.00** | 4.40 |
| | | | | 2) Constraction of Cement Nali (Drenge Line) From Arvind Pradhan to Vishwanath Pradhan House 100 m. | **10.00** | 4.40 |
| | | | | **2** | **20.00** | 8.79 |
| 3 | Deori | Deori | Palangaon | 1)Cement road from Hemraj Shahare to Main Road-200 m. | **20.00** | 8.79 |
| | | | | **1** | **20.00** | 8.79 |
| 4 | Deori | Deori | Mhaisuli | 1) Cement Road Mysuli from Buckaram Darro house to School Gate 200 m. | **20.00** | 8.79 |
| | | | | **1** | **20.00** | 8.79 |
| 5 | Deori | Deori | Pindakepar | 1)Ramakrishna Sontakke house to Ramlal Raut's house with Cement Drain 90 m. | **10.00** | 4.40 |
| | | | | 2 )Cement Concrete Drain 120 meters form Myanaram Chandanbatwe house to Shivcharan's house | **12.00** | 5.28 |
| | | | | **2** | **22.00** | 9.67 |
| 6 | Deori | Deori | Mehatakheda | 1) From Panchu Baldev Madavi's house to Bandadi Road - 200 meters( Tareification Road) | **20.00** | 8.79 |
| | | | | **1** | **20.00** | 8.79 |
| 7 | Deori | Deori | Rehali | 1) Construction of drain from Premlal Markam house to Agru Madavi house 250 m. | **25.00** | 10.99 |
| | | | | **1** | **25.00** | 10.99 |
| 8 | Deori | Deori | Chipota | 1.Construction of cement road from Ramsay Uike House to main road (150 m.) | **15.00** | 6.60 |
| | | | | 2. Construction of Cement Road from Sundarlal Pujari house to Cemetery (150 m.) | **15.00** | 6.60 |
| | | | | **2** | **30.00** | 13.19 |
| 9 | Deori | Deori | Salegaon | 1) Z.P.School to Ganesh Naik house 200 m Drainage Line | **20.00** | 8.79 |
| | | | | **1** | **20.00** | 8.79 |
| 10 | Deori | Deori | Sukali | 1) Installation of new hand pump | **1.00** | 0.44 |
| | | | | 2) Construction of cement road from Jageshwar Puram house to Madhorao Kovey's house 100 m. | **10.00** | 4.40 |
| | | | | 3) Construction of cement road up to house of Dilip Phulkuwar to Rajkumar Pandhare 100 m | **10.00** | 4.40 |
| | | | | **3** | **21.00** | 9.23 |
| 11 | Deori | Deori | Palandur | 1) Drain Construction 200 Meters from Bazar Chowk to Ramdas Kamble house | **20.00** | 8.79 |
| | | | | 2) Cement road barricade from Pramod Ambedare house to Gajanan Gajbhiye's House 100 m. | **10.00** | 4.40 |
| | | | | **2** | **30.00** | 13.19 |
| 12 | Deori | Deori | Yedmagondi | 1) Cement road construction-Narayan Salame house to Janiya Nareti house 100 m. | **10.00** | 4.40 |
| | | | | 2) Construction of cement road- From Ishwar Gontai house to Itwari Gonta house 100 m. | **10.00** | 4.40 |
| | | | | **2** | **20.00** | 8.79 |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| 13 | Deori | Deori | Dhamditola | 1) Construction of cement road-Durgesh Kumbhare house to Shivprasad Netam house 100 m. | **10.00** | 4.40 |
| | | | | 2) Covered drainage Construction-Durgesh Kumbhare house to Shivprasad Netam's house 100 m. | **10.00** | 4.40 |
| | | | | **2** | **20.00** | 8.79 |
| 14 | Deori | Deori | Mispiri | 1) Cement Road Prithviraj Madavi house to Sriram Netam house 100 m. | **10.00** | 4.40 |
| | | | | 2) Contruction Drain -Prithviraj Madavi house to Sriram Netam house 100 m. | **10.00** | 4.40 |
| | | | | **2** | **20.00** | 8.79 |
| 15 | Deori | Deori | Mahaka | 1)Construction Of Cement road from Keshoram Shyamalal Muleti (main road) to Sukhabai Shriram Kumeti house 250 meters | **25.00** | 10.99 |
| | | | | **1** | **25.00** | 10.99 |
| 16 | Deori | Salekasa | Pipariya | 1) Construction of cement road from Devendra Parteki's house to Santlal Bhalavi's house at Piparia. 100 M. | **10.00** | 4.40 |
| | | | | 2) Construction of double mini water supply scheme at Mauja Lodhi Tola (Pipariya) 100 M. | **10.00** | 4.40 |
| | | | | **2** | **20.00** | 8.79 |
| 17 | Deori | Salekasa | Murkudoh | 1) Drainage and sewage management Main road to Sukhalal Madavi house 100 M. | **10.00** | 4.40 |
| | | | | 2.construction of Drain from Raman Gawade house to Tarachand Inwate house 100 M. | **10.00** | 4.40 |
| | | | | **2** | **20.00** | 8.79 |
| 18 | Deori | Salekasa | Kosamtarra | 1) Construction of cement road from Nilchand Maraskolhe house to Bhuvan Farde's house.150 M. | **15.00** | 6.60 |
| | | | | 2) Dewaji Pradhan house to Dadu Garat house cement road 100 M. | **10.00** | 4.40 |
| | | | | **2** | **25.00** | 10.99 |
| 19 | Deori | Salekasa | Kopalgad | 1 Construction of Cement road from main road to Lake 100 M. | **10.00** | 4.40 |
| | | | | 2 Construction of cement road from Tejlal Patle house to Lake 100 M | **10.00** | 4.40 |
| | | | | **2** | **20.00** | 8.79 |
| 20 | Deori | Salekasa | Pandharwani | 1)Construction of Cement road from Chotelal Uike house to Sudhir Kodape house 120 M. | **12.00** | 5.28 |
| | | | | 2) Construction of Cement road Form Birajlal Madavi house to Milanbai Kapurderiya house 90 M. | **9.00** | 3.96 |
| | | | | 3) Construction of Cement road form Tulararsing Nitam to Devilal uike 90 m. | **9.00** | 3.96 |
| | | | | **3** | **30.00** | 13.19 |
| 21 | Deori | Sadak/Arjuni | Chirchadi | 1)Cement Road from Hanuman Temple to Umarzari Canal within the village 150 M. | **15.00** | 6.60 |
| | | | | 2) Construction of Drain from Hanuman Mandir to Chintaman Funde's house 200 M. | **20.00** | 8.79 |
| | | | | **2** | **35.00** | 15.39 |
| 22 | Deori | Sadak/Arjuni | Shenda | 1) Cement road from Omkar Meshram's house to Tularam Uike's house 100 M. | **10.00** | 4.40 |
| | | | | 2) Construction of such closed drain from Makkhan Sayam house to the house of Jagatram Meshram Masramtola 200 M. | **20.00** | 8.79 |
| | | | | **2** | **30.00** | 13.19 |
| 23 | Deori | Arjuini/Mor | Kumbhitola | 1) Roads (Intra Village Roads) from Hanuman Temple to Library C C. road 150 M. | **15.00** | 6.60 |
| | | | | 2) Drinking water facility - near water tank Solar based R.O. Setting up the project 500 Lit. per houses. | **7.00** | 3.08 |
| | | | | **2** | **22.00** | 9.67 |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| 24 | Deori | Arjuini/Mor | Gothangaon | 1) Ward no.1 Construction of Mata Mauli Chavadi (12X15) sqf. | **8.00** | 3.52 |
| | | | | 2) 200 Meter Drain Construction Ward no. In 1 | **20.00** | 8.79 |
| | | | | **2** | **28.00** | 12.31 |
| 25 | Deori | Arjuini/Mor | Ilda | 1) installation of Solar System and installation of R.O. 500 Lit. per hours | **7.00** | 3.08 |
| | | | | 2) Construction of Arjun Bhikam Madavi house to Peshi Lal Baishaku Kolhe house Cement Concrete Drainage 200 Meters | **20.00** | 8.79 |
| | | | | **2** | **27.00** | 11.87 |
| 26 | Deori | Arjuini/Mor | Budhewada | 1) CC Roads (Cement) a) From Gajajan Koram's house to lake 100. M. | **10.00** | 4.40 |
| | | | | 2) CC Road From Bandu Madavi's house to Dadaji Lanje farm house to canal 200 Meter. | **20.00** | 8.79 |
| | | | | **2** | **30.00** | 13.19 |
| 27 | Deori | Goregav | Bodunda | 1).Construction of covered drain from Sampatabai Margaye's house to Kisanlal Rane's house 200 M. | **20.00** | 8.79 |
| | | | | **1** | **20.00** | 8.79 |
| 28 | Deori | Gondia | Kharra | 1) Construction of Liabrary 15X15 sqf. | **10.00** | 4.40 |
| | | | | 2) R.O. 500 Liter per hours at Gram Panchayat | **7.00** | 3.08 |
| | | | | 3)Bhojan hall at Z.P. school Kharra 20X20 sqf. | **15.00** | 6.60 |
| | | | | **3** | **32.00** | 14.07 |
| 29 | Deori | Tiroda | Mangezari | 1) Construction of Covered drain from Ghansham Tekam house to Sampat Uike house 250 m. | **25.00** | 10.99 |
| | | | | **1** | **25.00** | 10.99 |
| 30 | Deori | Amangaon | Bagheda | 1) Sachin Bhave house To Purshottam Jagnik house (140 M.) Cement Road. | **14.00** | 6.16 |
| | | | | 2) Shivram Madavi house To Public Well Cement Road ( 150 M.) | **15.00** | 6.60 |
| | | | | **2** | **29.00** | 12.75 |
| **TOTAL** | | | | **54** | **726.00** | **319.23** |